विविध क्षेत्रातील अभ्यासक्रमांचा
आढावा उच्चस्तरावर घेण्यासाठी स्थायी
समितीची स्थापना

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग
शासन निर्णय क्रमांकः ईएसई-२००१/प्र.क्र.१६७/रोस्वरो-१,
नवीन प्रशासन भवन, १४वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः ६ डिसेंबर, २००१.

**प्रस्तावना :** महाराष्ट्र शासनाने आखलेल्या रोजगार व स्वयंरोजगाराचे धोरणात शिक्षणासंबंधीचे धोरण हा एक अविभाज्य व महत्वाचा भाग आहे. मंत्रिमंडळाच्या उपसमितीस असे आढळून आले की, शासनाच्या विविध अंगीकृत संस्था तसेच इतर मान्यताप्राप्त संस्था व उच्चस्तरीय शालेय शिक्षण यातील अभ्यासक्रम हे बदलत्या परिस्थितीशी सुसंगत व अनुरुप असणे आवश्यक आहे व आजमितीस जे अभ्यासक्रम किंवा ज्या प्रकारचे तांत्रिक शिक्षण दिले जात आहे त्यामध्ये मोठे बदल घडवून आणण्याची आवश्यकता आहे. हा दृष्टीकोन समोर ठेवून मंत्रिमंडळाच्या उप समितीने अशी शिफारस केली आहे की, प्रत्येक विभागाने आपल्या अधिपत्याखालील अभ्यासक्रमाचा सातत्याने आढावा घ्यावा. हा आढावा प्रत्येक विभाग सध्या प्रचलित असलेल्या पध्दतीनुसार व समित्यामार्फत घेईल. परंतु असा आढावा घेतला जात आहे किंवा नाही याच्यावर संनियंत्रण ठेवण्यासाठी, विभागास योग्य ते मार्गदर्शन देण्यासाठी तसेच सर्व विभागामध्ये प्रभावीरितीने समन्वय घडवून आणण्याचे कार्य उच्चस्तरावर होण्यासाठी एक उच्चस्तरीय स्थायी समिती स्थापन करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता, त्यास अनुसरून शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :** शासनाने आखलेल्या रोजगार व स्वयंरोजगाराच्या नवीन धोरणाच्या अनुषंगाने विविध क्षेत्रातील अभ्यासक्रमांचा आढावा घेतला जात आहे किंवा नाही याच्यावर संनियंत्रण ठेवण्यासाठी, विभागास योग्य ते मार्गदर्शन देण्यासाठी तसेच सर्व विभागामध्ये प्रभावीरितीने समन्वय घडवून आणण्याचे कार्य करण्यासाठी एक उच्चस्तरीय समिती मा. मंत्री (रोस्वरो.) यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे स्थापन करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १. मा. मंत्री (रोजगार व स्वयंरोजगार.) | अध्यक्ष |
| २. मा. राज्यमंत्री (रोजगार व स्वयंरोजगार.) | कार्याध्यक्ष |

GR - 20020121175456000 - 2600

३. मा. डॉ. हेमंत देशमुख, राज्यमंत्री (कामगार, वि. व न्या.) कार्याध्यक्ष

४. सल्लागार, रोजगार व स्वयंरोजगार सदस्य

५. प्रधान सचिव, कामगार सदस्य

६. सचिव (रोजगार व स्वयंरोजगार.) सदस्य

७. उद्योग विकास आयुक्त सदस्य

८. आयुक्त, कामगार सदस्य

९. आयुक्त, राजगार व स्वयंरोजगार संचालनालय सदस्य

१०. उप सचिव, रोजगार व स्वयंरोजगार सदस्य-सचिव

ज्या विभागाचा आढावा घ्यावयाचा असेल त्या सभेस संबंधित मा.मंत्री/मा. राज्यमंत्री, प्रधान सचिव/सचिव तसेच खातेप्रमुख यांना आमंत्रित करण्यात यावे. तसेच चर्चेस घेण्यांत यावयाच्या विषयाप्रमाणे इंडियन मर्चन्टस चेंबर, इतर चेंबर ऑफ कॉमर्स अॅन्ड इंडस्ट्रीजचे प्रतिनिधी यांना आमंत्रित करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(सु. प्र. पाण्डेय)
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति
राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मंत्री, रोजगार व स्वयंरोजगार यांचे खाजगी सचिव
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
राज्यमंत्री, रोजगार व स्वयंरोजगार यांचे खाजगी सचिव
राज्यमंत्री , कामगार, विधी व न्याय यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
मंत्रालयीन विभागांचे अ.मु.स. /प्र.सचिव/सचिव
श्री. दिनेश अफझुलपुरकर, सल्लागार, रोजगार व स्वयंरोजगार विभाग
प्रधान सचिव, कामगार
उद्योग विकास आयुक्त, उद्योग विभाग, मुंबई
आयुक्त, कामगार,
आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई-४०० ६१४.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), मुंबई
निवड नस्ती रोस्वरो-१.

GR-200201211754S000-2600